**उपसंचालक आरोग्य सेवा, नाशिक मंडळ, नाशिक यांच्या अंतर्गत ए.एन.एम. परिचर्या प्रशिक्षण महाविद्यालय, सामान्य रुग्णालय, मालेगाव येथील १० अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अपदे-२०२४/प्र.क्र.१५२/आरोग्य-४**

१० वा मजला, संकुल इमारत,
गोकूळदास तेजपाल रूग्णालय आवार, मंत्रालय, मुंबई
तारीख: २८ मे, २०२४

**वाचा:-**

१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.डीएचसी-३०१०/प्र.क्र.१८८/आरोग्य-३, दिनांक ०३.०२.२०११.
२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.अपदे-२०१७/प्र.क्र.९८/आरोग्य-४, दिनांक ०३.११.२०१७.
३) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक ०५.०३.२०१८, दिनांक ०७.०९.२०१८, दिनांक २१.०२.२०१९, दिनांक ११.०९.२०१९, दिनांक १२.०२.२०२०, दिनांक २०.०८.२०२०, दिनांक १५.०२.२०२१, दिनांक १०.०८.२०२१, दिनांक २२.०२.२०२२ दिनांक १८.०८.२०२२, दिनांक ०८.०२.२०२३, दिनांक ३१.०८.२०२३, दिनांक ०६.०९.२०२३ व दिनांक २१.०२.२०२४.
४) उपसंचालक, आरोग्य सेवा (शुश्रृषा), मुंबई यांचा प्रस्ताव क्र.संआसे/शुश्रृषा/कक्ष-९/टे-२/अपदे/एएनएमस्कूल मालेगांव/५०१-०३/२४, दिनांक २३.०१.२०२४.

**प्रस्तावना :-**

उपरोक्त क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये उपसंचालक आरोग्य सेवा, नाशिक मंडळ, नाशिक यांच्या अंतर्गत ए.एन.एम. परिचर्या प्रशिक्षण महाविद्यालय, सामान्य रुग्णालय, मालेगाव येथील १० अस्थायी पदे निर्माण करण्यात आलेत. उपरोक्त क्र.२ येथील शासन निर्णयान्वये सदर पदांना मुदतवाढ देण्यात आली होती. सदर पदांची यापुढेही आवश्यकता असल्याने सदर पदांना दिनांक ०१.०१.२०१८ ते दिनांक ३१.०८.२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

उपसंचालक आरोग्य सेवा, नाशिक मंडळ, नाशिक यांच्या अंतर्गत ए.एन.एम. परिचर्या प्रशिक्षण महाविद्यालय, सामान्य रुग्णालय, मालेगाव येथील १० अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्याबाबतचा उपसंचालक, आरोग्य सेवा (शुश्रृषा), मुंबई यांच्याकडून प्रस्ताव सादर करण्यात आला आहे.

२. या शासन निर्णयासोबत जोडलेल्या "परिशिष्ट-अ" मध्ये नमूद करण्यात आलेल्या ए.एन.एम. परिचर्या प्रशिक्षण महाविद्यालय, सामान्य रुग्णालय, मालेगाव येथील १० अस्थायी पदांना दिनांक ०१.०१.२०१८ ते दिनांक ३१.०८.२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

३. सदर अस्थायी पदांचे वेतन पुढील लेखाशिर्षामध्ये खर्ची टाकण्यात यावे आणि हा खर्च सन २०२४-२५ या वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

| अ.क्र. | लेखाशिर्ष |
|---|---|
| १ | मागणी क्रमांक आर १-मुख्य लेखाशिर्ष "-२२१०वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०६-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- राज्य योजनांतर्गत योजना, ) (०६)०-(१ मुफसल क्षेत्रातील अध्यापनेत्तर शासकीय रुग्णालये व दवाखाने (अनिवार्य) (०२२६ २२१०) |
| २ | मागणी क्रमांक आर-१, २२११- कुटुंब कल्याण, ००३- प्रशिक्षण, (०१)- कुटुंब कल्याण प्रशिक्षण- १०० टक्के केंद्र पुरस्कृत योजना, (०१) (०२)- सहायक परिचारिका प्रसाविका, दाई व आरोग्य प्रचारक या निमवैद्यकीय कर्मचाऱ्यांचे प्रशिक्षण (२२११ ०१११) |

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक ०५.०३.२०१८, दिनांक ०७.०९.२०१८, दिनांक २१.०२.२०१९, दिनांक ११.०९.२०१९, दिनांक १२.०२.२०२०, दिनांक २०.०८.२०२०, दिनांक १५.०२.२०२१, दिनांक १०.०८.२०२१, दिनांक २२.०२.२०२२ दिनांक १८.०८.२०२२, दिनांक ०८.०२.२०२३, दिनांक ३१.०८.२०२३, दिनांक ०६.०९.२०२३ व दिनांक २१.०२.२०२४ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे. सदर पदे व्यपगत झाले नसल्याची खात्री करण्यात आली आहे.

५. सदर पदांना यापुढील कालावधीकरीता मुदतवाढ देण्याबाबतचा प्रस्ताव सादर करताना या सोबतच्या "परिशिष्ट-अ" मधील तक्त्यात प्रत्येक आरोग्य संस्थेचे नाव, एकूण मंजूर पदे, स्थायी पदे व अस्थायी पदे (तपशिलवार माहिती) याबाबतच्या माहितीसह शासनास सादर करण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०४२९१२२७२०४२१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NEELAM GIRISH SANGWAI

Digitally signed by NEELAM GIRISH SANGWAI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=a9bbc429d62201a67249f70e60acdfadbff901fbbbf45cc393dbd6aa91fbd6ca, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=81E4E52421D72A2AE32DF6C7D06ABB4E6A7B5820C3A929F328AD6C0DCA4F38C7, cn=NEELAM GIRISH SANGWAI
Date: 2024.05.28 11:36:18 +05'30'

( नीलम संगवई )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/ नागपूर.
२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
३. सहसंचालक, आरोग्य सेवा, रूग्णालये (राज्यस्तर), मुंबई.
४. सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), मुंबई.
५. उपसंचालक, आरोग्य सेवा, नाशिक मंडळ, नाशिक.
६. जिल्हा शल्यचिकित्सक, जिल्हा रूग्णालय, नाशिक.
७. ए.एन.एम. परिचर्या प्रशिक्षण महाविद्यालय, सामान्य रुग्णालय, मालेगाव.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.
९. वित्त विभाग ( कार्यासन /व्यय-१३), मंत्रालय, मुंबई.
१०. निवडनस्ती ( आरोग्य-४ ), सा.आ.वि.

# “परिशिष्ट-अ”

(शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.अपदे-२०२४/प्र.क्र.१५२/आरोग्य-४,
दिनांक २८.०५.२०२४ सोबतचे विवरणपत्र)

| अ.क्र. | आरोग्य संस्थेचे नाव | एकूण मंजूर पदे | स्थायी पदे | अस्थायी पदे |
|---|---|---|---|---|
| १ | ए.एन.एम. परिचर्या प्रशिक्षण महाविद्यालय, सामान्य रुग्णालय, मालेगाव | १० | ०० | प्राचार्य, गट-क (१ पद)<br>पाठयनिर्देशक, गट-क (५ पदे)<br>लिपिक, गट-क (१ पद)<br>गृहपाल/ वार्डन, गट-क (२ पदे)<br>शिपाई, वर्ग-४ (१ पद) |

***********